आपेगाव (ता.पैठण) जि.औरंगाबाद ते कुरणपिंप्री (ता.गेवराई, जि.बीड) रा.म.६२ या रस्त्यावरील गोदावरी नदीवरील निम्नजलस्तर कॉजवे क्षतिग्रस्त होणे. अभ्यास गटाची नियुक्ती.

**महाराष्ट्र शासन**

**सार्वजनिक बांधकाम विभाग,**

शासन निर्णय क्रमांकः रस्तेनि-२०१४/प्र.क्र.११२/रस्ते-३

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.

दिनांक- १९ नोव्हेंबर, २०१४.

**शासन निर्णय**

आपेगाव (ता.पैठण, जि.औरंगाबाद) ते कुरणपिंप्री (ता.गेवराई, जि.बीड) रा.म.६२ या रस्त्यावरील गोदावरी नदीवरील निम्नजलस्तर कॉजवे क्षतिग्रस्त झाला आहे. सदरचा पूल क्षतिग्रस्त होण्याची कारणे शोधणे, भविष्यात अशी दुर्घटना घडू नये म्हणून उपाययोजना सुचविणे व पूलाची दुरुस्ती करण्याकरिता कार्यप्रणाली निश्चित करणे यासाठी समिती गठीत करणे ही बाब शासनाच्या विचाराधीन होती.

त्याअनुषंगाने खालीलप्रमाणे समिती गठीत करण्याचा शासनाने निर्णय घेतला आहे.

१) श्री. सी.पी. जोशी

मुख्य अभियंता,

सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, औरंगाबाद - अध्यक्ष

२) डॉ. डी.टी. ठुबे,

अधिक्षक अभियंता, संकल्पचित्र मंडळ(पूल)

कोकण भवन, नवी मुंबई. - सदस्य

३) श्री. व्ही.व्ही. कुलकर्णी

अधिक्षक अभियंता,

दक्षता व गुणनियंत्रण मंडळ, औरंगाबाद - सदस्य

४) श्री. रामगुडे,

कार्यकारी अभियंता,

संकल्पचित्र विभाग, नवी मुंबई - सदस्य-सचिव

सदर समितीची कार्यकक्षा खालीलप्रमाणे राहील-

१. पूल क्षतिग्रस्त होण्याची कारणे शोधणे

२. भविष्यातील बांधकामामध्ये अशाप्रकारची दुर्घटना होऊ नये यासाठी सुरक्षिततेच्या दृष्टीकोनातून उपाययोजना सुचविणे.

३. पूलाची दुरुस्ती करण्यासाठी कार्यप्रणाली निश्चित करणे.

समितीचे कामकाजासाठी होणारा खर्च ज्या कामाबाबत ही समिती नियुक्त केली आहे त्यांच्याशी संबंधित कार्यालयांनी त्यांना कार्यालयीन खर्चाच्या प्रयोजनार्थ उपलब्ध करुन दिलेल्या अनुदानातून करावा. आवश्यकतेनुसार समितीच्या कामकाजासाठी निमंत्रित अधिका-यांना बोलावण्यासाठी समिती अध्यक्षाना प्राधिकृत करण्यात येत आहे.

समितीने आपला अहवाल एक महिन्यांच्या आत शासनास सादर करावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४१११९१२४९२४२९१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Pradnya Subhash Walke

Digitally signed by Pradnya Subhash Walke
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Public Works Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Pradnya Subhash Walke
Date: 2014.11.19 13:25:28 +05'30'

**( प्रज्ञा वाळके)**
**अवर सचिव (रस्ते)**

**प्रत,**

१) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, औरंगाबाद
२) अधिक्षक अभियंता, संकल्पचित्र मंडळ(पूल), कोकण भवन, नवी मुंबई
३) अधिक्षक अभियंता, दक्षता व गुण नियंत्रण मंडळ, औरंगाबाद
४) कार्यकारी अभियंता, संकल्पचित्र विभाग, नवी मुंबई